जलसाक्षरता केंद्र व विभागीय केंद्राच्या जलसाक्षरता कार्यक्रमास सन २०२२-२३ ते सन २०२६-२७ या कालावधीकरिता मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या अधीन राहून शिल्लक राहीलेल्या निधीतून खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. संकीर्ण - २०२२/प्र.क्र.१०५/२२/लाक्षेवि(आस्था)
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- १०/०७/२०२४

वाचा: १) शासन निर्णय क्र. वाल्मी -२०१६/प्र.क्र.६९/१६/लाक्षेवि(आस्था), दि.३०/११/२०१६.
२) शासन निर्णय क्र. यशदा-२०१६/प्र.क्र.१११/१६/१२अ, दि.१६/०९/२०१६.
३) शासन निर्णय क्र. वाल्मी-२०१७/प्र.क्र.५८/१७/लाक्षेवि(आस्था), दि.०३/०८/२०१७.
४) शासन निर्णय क्र. जलसा-२०१८/प्र.क्र.३०८/२१८/सिं.व्य.(महसूल), दि.१९/०९/२०१८ (सुधारीत)
५) उपमहासंचालक तथा संचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था, यशदा, पुणे यांचे पत्र जा.क्र.जसाकेंद्र / मुदतवाढ प्रस्ताव/२०२२-२३/३०८, दि.१९/०७/२०२२.

प्रस्तावना:

संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ अन्वये यशदा, पुणे येथे कायमस्वरूपी राज्यस्तरीय जलसाक्षरता केंद्र आणि वन प्रशासन विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर, जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), औरंगाबाद व डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ विकास प्रशासकीय प्रबोधिनी, अमरावती येथे कायमस्वरूपी विभागीय केंद्रे स्थापन करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्र.४ येथील दि.१९/०९/२०१८ रोजीच्या सुधारित शासन निर्णयानुसार सदर ठिकाणी जलसाक्षरता केंद्रे कार्यान्वित करण्यात आली आहेत .

संदर्भाधीन शासन निर्णय क्र.३ अन्वये उपरोक्त नमूद जलसाक्षरता केंद्र व तीनही विभागीय जलसाक्षरता केंद्रे यांचे कार्यान्वयाबाबतच्या रू.२८२३.२८ लाख इतक्या प्रस्तावास प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

संदर्भ क्र.५ अन्वये यशदा, पुणे यांचेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार, या कार्यक्रमासाठी सदर प्रशासकीय मान्यतेनुसार रू.२८२३.२८ लाख इतक्या मंजूर निधीपैकी रू.३३६.३४ लाख इतका निधी खर्चित झाला असल्याने रू.२४८६.९४ लाख इतका निधी शिल्लक आहे. त्यामुळे सदर मंजूर

प्रशासकीय मान्यता प्रदान रकमेतील अखर्चित निधीच्या मर्यादेत सन २०२२-२३ ते सन २०२६-२७ या कालावधी करिता मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या अधीन राहून रू.१७१९.५०९७८ लाख इतक्या खर्चाच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती. त्यानुषंगाने खालील प्रमाणे निर्णय घेण्यात आलेला आहे.

**शासन निर्णय:-**

जलसाक्षरता व जलजागृती निर्माण करण्यासाठी यशदा पुणे येथे कायमस्वरूपी जलसाक्षरता केंद्र आणि वन अकादमी, चंद्रपूर, वाल्मी औरंगाबाद व डॉ.पंजाबराव देशमुख प्रशासकीय प्रबोधिनी, अमरावती येथे जलसाक्षरता केंद्रे कार्यान्वित करण्यात आली आहे. या कार्यक्रमासाठी मंजूर प्रशासकीय मान्यता प्रदान रकमेतील अखर्चित निधीच्या मर्यादेत सन २०२२-२३ ते सन २०२६-२७ या कालावधी करिता मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या अधीन राहून रू.१७१९.५०९७८ लाख इतक्या खर्चाच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. त्याबाबतचा तपशील सोबतच्या परिशिष्टात दर्शविण्यात आला आहे.

२. वरील मान्यता खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती** -

१) वार्षिक प्रशिक्षण कार्यक्रमाच्या आराखड्यास यशदास्तरीय समितीची मान्यता घ्यावी.

२) जलसाक्षरता केंद्र व विभागीय केंद्र यासाठीचे प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भाधीन शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वानुसार करावा.

३) यशदा केंद्र व विभागीय केंद्र येथील क्षेत्रीय खर्चास यशदा पुणे यांच्या प्रचलित कार्यपद्धतीनुसार मान्यता देण्यात यावी.

४) कार्यक्रमावर खर्च करण्यापूर्वी प्रशिक्षण कार्यक्रम अंतीम करण्यात यावा.

५) प्रशिक्षणाचे मुल्यमापन करणारे निर्देशके तयार करण्यात यावी.

६) प्रशिक्षण कार्यक्रमात प्रशिक्षण घेणारे प्रशिक्षणार्थी संख्या व इतर अनुज्ञेय बाबींवर होणा-या प्रत्यक्ष व्ययाच्या मर्यादेमध्ये खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

७) परिशिष्ट १ मधील प्रस्तावित बाबींवरील खर्च प्रशासकीय मान्यता मिळालेल्या खर्चाच्या अधीन राहून त्यात बदल करावयाचे झाल्यास यशदा स्तरीय समितीची मान्यता घेऊन पुढील कार्यवाही करण्यात यावी.

८) जलसाक्षरता या विषयावर विविध फिल्म तयार करण्यासाठी येणारा खर्च हा माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून प्रमाणित करून घेण्यात यावा. तसेच आवश्यकतेनुसार राष्ट्रीय फिल्म ॲण्ड टेलिव्हिजन इन्स्टीट्युट ऑफ इंडिया (NFTI), पुणे या केंद्रिय संस्थेचे सहाय्य व मार्गदर्शन घेण्यात यावे.

९) बैठकांचा तसेच आकस्मित खर्च निधीतून करतांना म.वि.अ. नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग ०१ ते ०५ मधील तरतूदीनुसार खर्च परिगणना करण्यात यावी.

१०) प्रत्यक्ष खर्चाची विवरणपत्रे व उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर करण्यात यावे.

११) सोबतच्या परिशिष्टातील क-आस्थापनासाठी तरतूद रू.३३९.२० लक्ष दर्शविलेली आहे. त्यावरील खर्च एकुण प्रशासकीय मान्यता किंमतीच्या (आस्थापना खर्च वगळून) १०% पर्यंत मर्यादित ठेवावा.

३. जलसाक्षरता केंद्रासाठी आणि विभागीय केंद्रासाठी आवश्यक निधी महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभागाकडून मागणीनुसार यशदा, पुणे यांना वेळोवेळी वर्ग करण्यात येईल. जलसाक्षरता केंद्र आणि विभागीय केंद्र यांच्यावर यशदाचे प्रशासकीय नियंत्रण राहील. लेखा परीक्षण आणि इतर बाबी यशदाच्या प्रणालीनुसार असतील.

४. सदरचा शासन निर्णय मृद व जलसंधारण विभागाच्या क्रमांक वाल्मी-२०२३/ अनौ.सं.क्र.२ / जल-९/दि.२०/०७/२०२३ तसेच नियोजन व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्रमांक २८६/का.१४३३/दि.३१/१०/२०२३ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४१८/व्यय-१२/दि.२०/११/२०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७१०११४०२४२६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VAIBHAV HANAMANTRAO PHALKE

Digitally signed by VAIBHAV HANAMANTRAO PHALKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=71fecd9f3e74a92a87c45c1824f9c8265082bcdd03e9b87813d104e5e1c1d477, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=4ABB61BFEA711AD5A1CFA209E9ADEE68129EF052F3865D6928401D4BD155B7A3, cn=VAIBHAV HANAMANTRAO PHALKE
Date: 2024.07.10 11:52:07 +05'30'

**( वैभव फाळके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

३. मा. उपमुख्यमंत्री (जलसंपदा),यांचे प्रधान सचिव.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त),यांचे प्रधान सचिव.
५. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
६. मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद / विधानसभा.
७. सर्व विधानपरिषद सदस्य / विधानसभा सदस्य.
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. सर्व अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.महालेखापाल १ / २ महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
११.महालेखापाल १ / २ महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर.
१२. महासंचालक, यशदा, पुणे.
१३.सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
१४.सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
१५.महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), औरंगाबाद.
१६.महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था (मेरी), नाशिक.
१७.महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी (मेटा), नाशिक.
१८.संचालक, डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय आणि विकास प्रबोधिनी, अमरावती.
१९.संचालक, वन प्रशासन विकास व व्यवस्थापन प्रबोधिनी, चंद्रपूर.
२०.सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
२१.सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२२.सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३.सर्व सह सचिव / उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४.सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५.निवडनस्ती/लाक्षेवि (आस्था).

**परिशिष्ट - १**

शासन निर्णय क्र.संकीर्ण - २०२२/प्र.क्र.१०५/२२/लाक्षेवि (आस्था), दि.१०/०७/२०२४ सोबतचे परिशिष्ट

| अ.क्र. | विषय | एकूण रक्कम (रुपये लाखात) |
|---|---|---|
| **अ)** | **प्रशिक्षण** | |
| १ | कार्यशाळा (यशदा व विभाग स्तर) | १०३.२२ |
| २ | प्रशिक्षणाचे विश्लेषण व आरेखन (TNA) | ४.०० |
| ३ | प्रविण प्रशिक्षक प्रशिक्षण | ६.८ |
| ४ | जलनायक व जलयोध्दा (राज्य व विभाग स्तर) ७२ | ११.५२ |
| ५ | जलकर्मी १०२० (शासकिय अधिकारी/ कर्मचारी) | १०६.०८ |
| ६ | जलप्रेमी (जिल्हास्तर) ३४० | ४०.८ |
| ७ | जलदूत (तालुका) ३५१० | ४२१.२० |
| ८ | जलसेवक ७५७५ | ३९३.९० |
| **अ)** | एकूण (१ ते ८) | १०८७.५२ |
| **ब)** | अभ्यास, प्रलेखन, प्रसार साहित्य, वाचन साहित्य इ. | १६९.९० |
| **क)** | आस्थापना खर्च | ३३९.२० |
| **एकूण (अ+ब+क)** | | १५९६.६२ |
| **ड)** | विविध केंद्रांचे कार्यान्वयन व अनुषंगिक बाबी | १२२.८८ |
| **एकूण (अ+ब+क+ड)** | | **१७१९.५१** |

*******